पंचायत समिती, बिलोली (जि. नांदेड) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०२०/प्र.क्र.१६१/बांधकाम-४

५ वा मजला, २५ मर्झबान पथ, बांधकाम भवन,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१

तारीख : ०७ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रा.वि.व ज.सं.वि.क्र.पंसई-२००९/प्र.क्र.१६२/पंरा-७, दिनांक ३१ डिसेंबर, २०१०.

२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.पंसई-२०१५/प्र.क्र.१६२/पंरा-७, दिनांक ०६ मे, २०१७.

३) **अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांचे पत्र क्रमांकः** जिपना/बांदवि/डिबी/१४३८/२०२०, दिनांक १० डिसेंबर, २०२०.

४) **कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, नांदेड यांचे पत्र क्रमांकः** जिपना/बांदवि/तांशा/पी.बी.-२/४२२/२०२१, दिनांक ०८ मार्च, २०२१.

**प्रस्तावना :-**

अति. मुख्य कार्यकारी अधिकारी व कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, नांदेड यांनी वाचा मधील अनुक्रमांक २ व ३ येथील पत्रांन्वये बिलोली पंचायत समितीच्या (जि. नांदेड) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. उक्त वाचा मधील अनुक्रमांक १ येथील दिनांक ३१ डिसेंबर, २०१० रोजीच्या शासन निर्णयान्वये, बिलोली पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीच्या रु.१४८.८९ लक्ष किंमतीच्या सविस्तर अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, अनुक्रमांक २ येथील दिनांक ०६ मे, २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये, बिलोली पंचायत समिती (जि. नांदेड) नवीन प्रशासकीय इमारतीच्या रु.१९६.५० लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता

देण्यात आलेली आहे. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांनी प्रस्तावित केल्यानुसार, पंचायत समिती, बिलोली (जि. नांदेड) येथील प्रशासकीय इमारतीचे काम सन २०१८ मध्ये पूर्ण झालेले आहे. सदर इमारतीत फक्त स्थापत्यचे काम काम करण्यात आले असून अधिकारी, पदाधिकारी यांच्या दालनात कोणतेही फर्निचर पुरविण्यात आलेले नाही. तसेच बऱ्याच कर्मचाऱ्यांसाठी टेबल, खुर्ची, कपाट उपलब्ध करून देण्यात आलेले नाही. तथापि, सदर इमारतीत शासकीय काम करताना अधिकारी, पदाधिकारी व कर्मचारी यांना अडचणी येत आहेत. तसेच, इमारतीच्या परिसरात होत असलेले अतिक्रमण पाहता त्यासाठी इमारतीस भोवताली कंपाऊंड वॉल बांधकाम करणे आवश्यक आहे. याकरीता अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांनी पंचायत समिती, बिलोली (जि. नांदेड) येथील प्रशासकीय इमारत बांधकामाच्या उपकामाचे सन २०२०-२१ च्या दरसूचीवर आधारित रू.१७०.५३ लक्ष किंमतीचे अंदाजत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, नांदेड यांनी साक्षांकित केलेले आहे. तसेच अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांनी प्रस्तावासोबत अंदाजपत्रक, नकाशा, पंचायत समितीच्या ठरावाची प्रत इत्यादी आवश्यक कागदपत्रे सादर केलेली आहेत.

०३. अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची आवश्यकता तसेच, छाननी अंती पंचायत समिती, बिलोली (जि. नांदेड) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामाच्या रू.१७०.५३ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

पंचायत समिती, बिलोली (जि. नांदेड) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामाच्या एकूण रुपये १,७०,५३,०००/- (रूपये एक कोटी सत्तर लक्ष त्रेपन्न हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) पंचायत समिती, बिलोली (जि. नांदेड) प्रशासकीय इमारतीकरिता शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करून घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

०२. पंचायत समिती, बिलोली (जि. नांदेड) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे.

**General Abstract for Furniture and Sub Work of P. S.Biloli Adm. Building, Dist. Nanded**

| Sr.No. | Description of item | Cost In Rs. |
|---|---|---|
| | **Part - A** | |
| **1** | Taotal Estimated Cost | 12009388.00 |
| **2** | Cost of Royalty and Q. C. Testing Charges | 108080.00 |
| | **Total** | **12117468.00** |
| | **Part – B** | |
| **3** | Cost of Electrification | 1385924.00 |
| **4** | Add 0.50 % for Insurance of Contract | 66977.00 |
| **5** | Add 12.0 % GST | 1607437.00 |
| **6** | Add 4.0 % for Contingencies | 535812.00 |
| **7** | Add 10.0 % fpr Change inS.S.R. | 1339531.00 |
| | **Total** | **17053149.00** |
| | **Says in Rs.** | **1,70,53,000/-** |

**०३.** उपरोक्त बांधकामासाठी संबंधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरूपात, टप्प्या-टप्प्याने निधी उपलब्ध करून दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५ – इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा

परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि. क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०८०७१५०४४९२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.08.09 15:12:07 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा. विधानसभा व विधानपरिषद सदस्य, विधानमंडळ, मुंबई.
२) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
३) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
६) मा. मंत्री (ग्रा. वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
८) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, नांदेड.
१०) कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, नांदेड.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा नांदेड.
१२) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१३) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
१४) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नांदेड.

१५) सभापती, पंचायत समिती, बिलोली, जि. नांदेड.
१६) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, बिलोली, जि. नांदेड.
१७) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.